**सर्व अकृषि विद्यापीठांनी वार्षिक लेखे महालेखापाल यांना नियमित सादर करणेबाबत..........**

**महाराष्ट्र शासन**

उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
शासन निर्णय क्रमांक संकीर्ण २०१०/(७५/१०)/विशि-२,
मंत्रालय,विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : २० मे, २०१०.

**<u>प्रस्तावना :</u>**

राज्यात या विभागांतर्गत एकूण १३ अकृषि विद्यापीठे कार्यरत असून, त्यामध्ये १० पारंपारीक व ३ अपारंपारीक विद्यापीठांचा समावेश आहे. महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम, १९९४ च्या कलम १०३ मधील तरतूदीनुसार १० पारंपारीक विद्यापीठांनी तसेच कविकुलगुरु कालिदास संस्कृत विद्यापीठ अधिनियम, १९९७ च्या कलम ८२, डॉ. बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ अधिनियम, १९८९ च्या कलम ७० आणि यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ अधिनियम, १९८९ च्या कलम २७ मधील तरतूदीनुसार या ३ अपारंपारीक विद्यापीठांनी त्यांचे **वार्षिक लेखे व लेखापरीक्षणाचे काम दरवर्षी वित्तीय वर्ष संपल्यानंतर सहा महिन्याचे आत पूर्ण करणे बंधनकारक आहे.**

२. अकृषि विद्यापीठांना वेतन व वेतनेतर विकास विषयक कामांसाठी शासनाकडून वेळोवेळी निधी उपलब्ध करुन देण्यात येतो. त्याचप्रमाणे विद्यापीठाकडे फी शुल्क, देणगी इ. स्वरुपात निधी जमा होतो. सदरचा सर्व निधी हा सार्वजनिक स्वरुपाचा असल्यामुळे या निधीचे लेखे महालेखापाल यांच्याकडून तपासून घेणे अनिवार्य आहे.

३. तथापि विद्यापीठ कायद्याप्रमाणे विद्यापीठांनी गेल्या अनेक वर्षापासून त्यांचे वार्षिक वित्तीय लेखे (Finance Account) बंद केले नसल्याचे, वार्षिक लेख्यांचे लेखा परीक्षण केले नसल्याचे त्याचप्रमाणे असे लेखे महालेखापाल कार्यालयाकडे तपासणीसाठी सादर केले नसल्याची गंभीर बाब प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र राज्य यांनी शासनाच्या नुकतीच निदर्शनास आणली आहे.

४. मा. कुलपती यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या संयुक्त बैठकीत (जेबीव्हीसी) तसेच मा. उच्च न्यायालयाने निरनिराळ्या याचिकांमध्ये निर्णय देताना उच्च शिक्षणाचा दर्जा वाढविणे तसेच विद्यापीठातील वित्तीय शिस्त (Financial Discipline) राखण्याबाबत योग्य ती पावले उचलण्यासाठी शासनाला व विद्यापीठांना आदेशित केलेले आहे. त्यामुळे शासन याद्वारे खालीलप्रमाणे आदेश देत आहे :-

**शासन निर्णय**

५. (i) सर्व अकृषि विद्यापीठांनी सन २००८-०९ पर्यंतचे सर्व प्रलंबित लेख्यांचे लेखा परीक्षण अधिनियमातील तरतूदीप्रमाणे पूर्ण करुन **दि.३० सप्टेंबर, २०१० पर्यंत** संबंधित महालेखापाल यांच्याकडे सादर करावेत व तद्संबंधिचा अनुपालन अहवाल संचालक, उच्च शिक्षण व शासनास सादर करावा.

(ii) सन २००९-२०१० व त्यापुढील वार्षिक लेख्यांचे लेखा परीक्षण अधिनियमातील तरतूदीप्रमाणे पूर्ण करुन संबंधीत आर्थिक वर्ष संपल्यानंतर **पुढील सहा महिन्यात** लेखा अहवाल संबंधीत महालेखापाल यांच्याकडे नियमितरित्या सादर करावा व तद्संबंधीचा अनुपालन अहवाल संचालक, उच्च शिक्षण व शासनास सादर करावा.

६. विद्यापीठाचे वार्षिक लेखे नियतिमतरित्या महालेखापाल यांच्याकडे सादर करण्याची **सर्व जबाबदारी विद्यापीठाचे कुलगुरु, प्र-कुलगुरु, कुलसचिव, वित्त व लेखा अधिकारी आणि लेखा अधिकारी यांची आहे.**

७. सन २००८-०९ या आर्थिक वर्षापर्यंतचे सर्व प्रलंबित लेखे महालेखापालांकडे दि.३० सप्टेंबर,२०१० पर्यंत सादर न केल्यास त्या विद्यापीठाच्या उक्त पाचही अधिकाऱ्यांचे विरुध्द आवश्यकती शिस्तभंगाची कारवाई करण्यात येईल. (उदा. वेतन विलंबित ठेवणे इत्यादी)

तसेच यापुढे सन २००९-१० या आर्थिक वर्षापासून विद्यापीठाने वार्षिक लेखे प्रत्येक वर्षी वित्तीय वर्ष संपल्यानंतर ६ महिन्यांच्या आंत महालेखापाल यांना सादर न केल्यास ते प्रत्यक्ष सादर होईपर्यन्त उक्त पाचही अधिकाऱ्यांचे विरुध्द आवश्यकती शिस्तभंगाची कारवाई करण्यात येईल. (उदा. वेतन विलंबित ठेवणे इत्यादी) या कालावधीत या अधिकाऱ्यांनी कोणत्याही स्त्रोतातून वेतन काढल्यास ती बाब निधीच्या अपहारात गणण्यात येईल.

८. **सदर शासन निर्णय महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम, १९९४ मधील कलम ८(४) इत्यादी नुसार प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.**

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.govt.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक **२०११०२२५१८५०५७००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( रा. ह. कोळी )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,
मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
मा. कुलगुरु सर्व अकृषि विद्यापीठे,
कुलसचिव, सर्व अकृषि विद्यापीठे,
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा. मंत्री (उ. व तं.शि.), यांचे खाजगी सचिव,
मा. राज्यमंत्री (उ. व तं.शि.) यांचे खाजगी सचिव,
परीक्षा नियंत्रक, सर्व अकृषि विद्यापीठे,
शिक्षण संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
सर्व विभागीय सह संचालक, उच्च शिक्षण,
सर्व अकृषि विद्यापीठांचे संचालक, विद्यापीठ व महाविद्यालय विकास मंडळ,
सर्व सह सचिव/ उप सचिव / अवर सचिव / कार्यासन अधिकारी, उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
निवड नस्ती - विशि-२